**श्रद्धा आणि ज्ञान**

**वसंत पळशीकर**

ज्ञानाशिवाय एखाद्या गोष्टीच्या सत्यतेवर विश्वास ठेवणे म्हणजे श्रद्धा असे म्हटले जाते. ज्ञान आत्मप्रत्ययांतून होते. आत्मप्रत्यय अनुभवातून येतो. अनुभवाचे स्वरूप नेहमीच वैयक्तिक असते. अनुभवाचे आदानप्रदान (Communication) होऊ शकत नाही. आदानप्रदान होते ते अनुभवाच्या अन्वयार्थाचे (Interpretation). त्याचा अर्थ असा की ज्ञानाची प्रक्रिया ही वैयक्तिकच राहते. एकाला झालेले ज्ञान तो हजारांना देऊ शकत नाही. ज्या अनुभवाने त्याला ज्ञान झाले त्या अनुभवातून त्या हजारच्या हजार लोकांना जावे लागेल तेव्हाच त्यांना ज्ञान होईल. ज्ञानाचे स्वरूप वैयक्तिक असल्यामुळे श्रद्धेचेही स्वरूप वैयक्तिक राहणार.

**श्रद्धा आणि ज्ञान यांचे उगमस्थान**

श्रद्धा काय, किंवा ज्ञान काय, दोहोंचा उगम माणसाच्या मनात होतो, त्यांना मानवी मनाखेरीज स्वतंत्र अस्तित्व नाही. भौतिक घटनेप्रमाणे त्यांचे अस्तित्व नसल्यामुळे भौतिक घटनेप्रमाणे श्रद्धेचे किंवा ज्ञानाचे अस्तित्व व्यक्तिभिन्न असत नाही. म्हणून श्रद्धा किंवा ज्ञान हे कोणत्याही गोष्टीचे उपजत (inherent) गुणधर्म नाहीत. एकच गोष्ट एका माणसाला श्रद्धेचा विषय असेल तर दुसऱ्या माणसाला ज्ञानाचा विषय असेल. काही विषयांचे श्रद्धेशी आणि काहीचे ज्ञानाशी कायमचे लग्न लावून टाकण्याची सर्वसामान्य प्रवृत्ती चुकीची व दिशाभूल करणारी आहे.

**एक मिथ्या समजूत**

धर्म आणि श्रद्धा यांचा अविभाज्य संबंध आहे असे गृहीत धरले जाते.

अशी लोकांची समजूत आहे. जिथे धर्म आहे तेथे बुद्धी आणि ज्ञान यांचा संबंध नाही, असे मानले जाते. हे पूर्वग्रह मनात इतके पक्के ठसले आहेत, की कोणत्याही विवेचनाच्या वेळी सर्वमान्य सत्य म्हणून त्यांचा स्वीकार केला. जातो. त्यांना जवळजवळ भौतिक गोष्टींचाच (Physical facts) दर्जा प्राप्त झाला आहे. हा पूर्वग्रह माणसाच्या सुप्त मनाचा एक भाग बनला आहे.

**श्रद्धा आणि विज्ञान**

युरोपमध्ये ज्या वेळी सोळाव्या व सतराव्या शतकात विज्ञानाची प्रगती सुरू झाली त्या वेळी प्रत्येक वैज्ञानिक शोधाचा धार्मिक समजुतीच्या दृष्टीने घातक परिणाम होऊ लागला. प्रत्येक शोधाबरोबर एक एक धार्मिक समजूत खोटी ठरू लागली. बायबलमध्ये लिहिलेली प्रत्येक गोष्ट खरी आहे या श्रद्धेवरच चर्चचे सारे कार्य आधारलेले होते. धर्म ही एक श्रद्धेची बाब होऊन बसली होती. विज्ञानाच्या प्रगतीला धर्मसंस्थेचा अत्यंत कडवा विरोध. पण विज्ञानाची प्रगती चालूच राहिली आणि १९व्या शतकात विज्ञान सार्वभौमपदाला पोचले. विज्ञानाचा धर्माशी प्रथम संबंध आला त्या वेळी धर्म आणि श्रद्धा यांचा अविभाज्य संबंध आहे असे धर्ममार्तंडांच्याही मनात ठसलेले होते. त्यामुळे स्वाभाविकच वैज्ञानिकांच्या मनात त्याची प्रतिक्रिया निर्माण झाली व त्यांनी धर्माचे व श्रद्धेचे लग्न लावून दिले. विज्ञान सार्वभौम झाले

त्या वेळी वैज्ञानिकांची ही प्रतिक्रिया, हा पूर्वग्रह लोकांनी मान्य केला. सगळ्यांत आश्चर्याची गोष्ट ही, की धर्मनिष्ठांनीही या पूर्वग्रहाला मान्यता दिली व एक आवश्यक श्रद्धा म्हणून धर्माचा प्रसार करायला सुरुवात केली.

**विज्ञान आणि व्यवहार**

धर्म=श्रद्धा आणि श्रद्धा=अज्ञान. तेव्हा धर्म=अज्ञान, अंधश्रद्धा; असे एक समीकरण बनले. विज्ञानाची साधना दोन. प्रयोग आणि तर्क (Reason) तर्क हे बुद्धीचे साधन. तेव्हा बुद्धिप्रामाण्य हाच विज्ञानाचा मार्ग असे दुसरे समीकरण बनले. वैज्ञानिक प्रयोगांचा आधार शरीराची पाच इंद्रिये. त्यावरून इंद्रियगम्य तेवढेच खरे ज्ञान असे आणखी एक समीकरण बनले; आणि सत्य म्हणजे इंद्रिय गम्य ज्ञान असे सर्वजण मानू लागले. त्याचा परिणाम असा झाला की धर्मात ज्ञानाचा, प्रत्यक्ष अनुभवाचा काही भाग आहे ही गोष्टच मुळी नाकारली गेली. ईश्वर, आत्मा या संबंधीचे सिद्धपुरुषांचे अनुभव, ज्ञान म्हणून कोणी स्वीकारायला तयार होईना. चांगलेवाईट यासंबंधी सांगितलेले व्यावहारिक सिद्धांत केवळ धर्मात आहेत, या एकाच गोष्टीमुळे नाकारले गेले.

**पंचेद्रियांपलीकडील ज्ञानसाधन**

अनुभव प्राप्त करून घेण्याचे एकमेव साधन म्हणजे इंद्रिये, तेव्हा इंद्रियगम्य तेवढे ज्ञान हे तत्त्वदृष्ट्या खरे आहे; पण इंद्रियांच्या अनुभवकक्षेत न येणाऱ्या अनेक गोष्टी जगात आहेत हे वैज्ञानिकांच्याही लक्षात यायला फार काळ लागला नाही. काही घटना अशाही घडत असतात, की ज्यांचा उलगडा सामान्य मार्गांनी केला जाऊ शकत नाही. याचा परिणाम असा झाला आहे की पाच इंद्रियांखेरीज अनुभव प्राप्त करून घेण्याचे साधन मनुष्याला उपलब्ध आहे ह्या गोष्टीला आज मान्यता मिळू लागली आहे. अनेक अनुभव मेंदूच्या द्वारे ग्रहण केले जातात असे मानणारे व त्या दिशेने प्रयत्न करणारे शास्त्रज्ञ आजही कमी नाहीत. इंद्रियांच्या मर्यादेच्या या जाणीवेने महत्त्वाचे कार्य केले आहे. धर्मातील आध्यात्मिक आणि 'सत्यं, शिवं, सुंदरम्' या संबंधीच्या विचारांचे चिकित्सक वृत्तीने का होईना, पण पूर्वग्रहरहित मनाने अध्ययन होऊ लागले आहे.

**तर्क आणि बुद्धी**

विज्ञान क्षेत्रात तर तर्काने जी प्रमये शोधून काढली जातात, त्यांच्या सत्यतेचा पडताळा प्रयोगाने मिळेपर्यंत ती सिद्ध झाली असे मानले जात नाही. तर्क हेच बुद्धीचे एकमेव साधन मानले तर जी तर्काची मर्यादा तीच बुद्धीचीही मर्यादा बनते. काही गृहीत तत्त्वे (Basic assumptions) हाताशी असल्याशिवाय तर्काचे शस्त्र काम करू शकत नाही; आणि ही गृहीत तत्त्वे ज्या घटनांवरून, ज्या प्रक्रियेने ठरतात त्यावर तर्काचा अगर बुद्धीचा काहीच उपाय चालत नाही. याखेरीज तर्काच्या आणखी काही मर्यादा आहेत. अनुभव शब्द आणि शब्दचिन्हे (Words and Word symbols) यांच्या परिभाषेत आविष्कृत झाल्यानंतरच तर्काची प्रक्रिया सुरू होते. त्यामुळे कोणताही अनुभव बुद्धीच्या पलीकडेच राहतो. ह्या तर्काच्या मर्यादेमुळे ज्ञानाची किती तरी क्षेत्रे बुद्धीच्या कक्षेतून सुटतात. बुद्धी अनुभवाचा अर्थ लावते. एका व्यक्तीने लावलेला अर्थ ती व्यक्ती दुसऱ्याला समजावून देऊ शकते. पण बौद्धिक विवेचनामधून अनुभवाचे आदानप्रदान होऊ शकत नाही; आणि जर अनुभवाचे आदानप्रदान होऊ शकत नसेल तर ज्ञानाचेही आदानप्रदान होऊ शकत नाही,

असे मानावे लागेल.

**धर्मविचार कोठे येतो?**

इतके असूनही बुद्धिप्रामाण्य हाच ज्ञानाचा एकमेव मार्ग असे का मानले. गेले? कारण विज्ञानयुगाच्या आरंभी बुद्धीच्या साहाय्याने जे अंदाज बांधले गेले. ते प्रयोगाने खरे ठरत गेले. वैज्ञानिक काही सिद्ध प्रमेयांच्या आधारावर गणिताच्या म्हणजेच पर्यायाने बुद्धीच्या साहाय्याने नवीन नवीन अंदाज, कल्पना बांधत असतात आणि त्यांतल्या बहुशः प्रयोगांती खऱ्या ठरत असतात. केवळ विज्ञान हेच बुद्धीचे कार्यक्षेत्र नव्हे. त्यामुळे विज्ञानक्षेत्रातील अनुभवांच्या जोरावर सर्वसाधारण सिद्धांत ठरवून उपयोग नाही. विज्ञानाच्या क्षेत्रातले अंदाज खरे ठरतात; त्याचे कारण निसर्गातही एक प्रमाणबद्धता, नियमितता आहे; आणि तर्काचे तर तेच वैशिष्ट्य आहे. आज विज्ञानाच्या क्षेत्रातही अशी वेळ आली आहे, की तेथे तर्क काम देईनासा झाला आहे. परमाणूंच्या हालचाली बुद्धीच्या पलिकडच्या आहेत असे आढळून येत आहे. त्यामुळे खुद्द वैज्ञानिकांच्या बुद्धीवरच्या आत्यंतिक श्रद्धेला तडे गेले आहेत. बुद्धीची आणखी एक मर्यादा आहे. 'काय आणि कसे' या दोन प्रश्नांचे उत्तर बुद्धीच्या साहाय्याने काही अंशी देता येते पण 'का' (Why) या प्रश्नाचे मात्र उत्तर बुद्धी नेहमीच देऊ शकते असे नाही. ते काम बुद्धीच्या ताकदीबाहेरचे आहे. धर्मविचाराचा एक भाग ह्या प्रश्नाचे उत्तर देण्याचा प्रयत्न करतो.

**विज्ञान हीदेखील श्रद्धाच बनली आहे**

धर्मविचार ही केवळ श्रद्धेची बाब नाही; आणि बुद्धीची उपासना हाच ज्ञानसंपादनाचा एकमेव मार्ग नाही; इतकेच नव्हे तर बुद्धीच्या साहाय्याने ज्ञान होऊ शकते का, असादेखील प्रश्न करता येईल. तसेच अनुभव आणि ज्ञान यांची प्रक्रिया वैयक्तिक असल्याने, ज्ञान होण्यापूर्वी प्रत्येकाला स्वतंत्रपणे अनुभवातून गेले पाहिजे. या तीन गोष्टी येथवर स्पष्ट झाल्या. सर्वसामान्य लोकांच्या दृष्टीने विज्ञान ही देखील एक श्रद्धेचीच बाब आज झाली आहे. विज्ञानाला किंवा बुद्धिप्रामाण्याला धर्मापेक्षा आणि श्रद्धेपेक्षा श्रेष्ठ मानणे म्हणजे बुद्धीचे उपासक होणे नव्हे. (To believe in the supremacy of intellect is also a faith.) याचा अर्थ असा होतो, की सर्वसाधारण लोकांच्या जीवनात श्रद्धेचे स्थान होते तेच आहे. फरक एवढाच आहे, की आज श्रद्धेचे लक्ष्य बदलले आहे. पूर्वी लोक धर्माला मानीत, आता विज्ञानाला मानतात. ही वस्तुस्थिती लक्षात घेतली तरच या जटिल समस्येचा अर्थ नीट लागतो.

**ज्ञानाचा मार्ग माणसे का टाळतात?**

या विश्वाचा विस्तार इतका अफाट आहे की काल, स्थल आणि आकार यांची मर्यादा असलेला माणूस या भौतिक जगाचे इंद्रियांनी पूर्ण ज्ञान करून घेऊ शकत नाही. त्यामुळे रोजच्या व्यवहारात श्रद्धेचे स्थान अपरिहार्य बनते आणि ते महत्त्वाचे आहे. पण जे आपण प्रत्यक्ष अनुभवू शकत नाही, ज्या गोष्टीचे आपणास ज्ञान होऊ शकत नाही, त्याच गोष्टीबाबत श्रद्धेचा आधार माणूस घेतो असे नाही. तर जे अनुभवता येण्यासारखे आहे पण जे अनुभवण्याकरता तपश्चर्या करावी लागेल, जे अनुभवले म्हणून कोणी बक्षीस देणार नाही असे ज्ञान करून घेण्याचा फारच थोडे लोक प्रयत्न करतात. हा प्रांत आध्यात्मिक ज्ञानाचा आहे. पण एवढेच नाही तर जेथे श्रद्धेने चालण्यासारखे आहे तेथे विचार

करावयाचे देखील माणसे टाळतात, मग अनुभवण्याची गोष्ट तर दूरच राहिली! हे असे का? ही ज्ञानाची प्रेरणा बहुतांश लोकांत प्रबल का होत नाही? त्याचे एकच कारण आहे. ज्ञानाची उपासना ही तलवारीवरची कसरत आहे. त्यात एकाग्रता लागते, वैराग्य वृत्ती लागते. भौतिक सुखाच्या आसक्तीमुळे लोक ही तपश्चर्या करण्याच्या भानगडीत पडत नाहीत. पण एक प्रश्न शिल्लकच राहतो. रोजच्या व्यवहारात जितक्या ज्ञानाची व श्रद्धेची गरज आहे, तितक्याच मर्यादेत माणूस का राहत नाही? जीवनाच्या सर्व क्षेत्रांत काम देईल अशी एक व्यापक श्रद्धा शोधण्याचा त्याचा सतत प्रयत्न का चालू असतो?

**श्रद्धेचे मूळ काय?**

या जगात माणसाला अनेक दु:खे, व्याधी सोसाव्या लागतात. अनेक संकटांतून त्याला जावे लागते. आजच्या समाजरचनेत बहुसंख्य लोकांच्या वाट्याला दुःखच जास्त येते; आणि माणसाची धडपड तर सुखाकरता चाललेली असते. पण दुःख आणि क्लेश टाळता येत नाहीत हा माणसाचा आज अनेक शतकांचा अनुभव आहे. मग क्लेश कमी करण्याचा एकच उपाय शिल्लक राहतो. सुरक्षिततेसाठी चाललेल्या माणसाच्या धडपडीतून त्याचा उगम आहे. कारण ऐहिक सुखाच्या निश्चिततेकरता प्रयत्न हा सुरक्षिततेकरताच चाललेला प्रयत्न आहे. पण केवळ ऐहिक सुखाच्या निश्चिततेकरता प्रयत्न हा सुरक्षिततेकरताच चाललेला प्रयत्न आहे. पण केवळ ऐहिक दुःखाविरुद्ध नुसत्या भौतिक उपाययोजना करून भागत नाही हे लवकरच माणसाच्या लक्षात येते. प्रत्येक घटनेमुळे मनात निर्माण होणाऱ्या प्रतिक्रिया हे मानसिक क्लेशाचे व अशांततेचे एक कारण बनते. त्याविरुद्ध मनाला सुरक्षित करायला हवे. मनाला सुरक्षित करण्याचे दोन उपाय :

एक तर मन जिंकणे - सुखदुःखाच्या पलिकडे जाणे; किंवा मन मारून टाकणे, म्हणजे निर्माण होणाऱ्या प्रतिक्रियांवर नियंत्रण ठेवणे, त्याला एक विशिष्ट आकार देणे. हे मनाला एका विशिष्ट व्यापक श्रद्धेत जखडून टाकण्याने होते.

**महत्त्वाची समस्या व उत्तर**

सुरुवातीला डोळस असलेली श्रद्धा मागाहून आंधळी का होते? सुरुवातीला नव्याचे स्वागत करणारी श्रद्धा मागाहून कोणत्याही नव्या गोष्टीला किंवा अनुभवाला आपली दारे का बंद करते? कोणत्याही श्रद्धेच्या बरोबर तिच्या सावलीप्रमाणे कर्मकांड का उभे राहावे? या सगळ्यांचे उत्तर यात मिळते Faith, if it has to give greatest security, needs to be precise, concrete, and also needs to promise continuity. जड, संकुचित, आंधळी, कर्मकांडी बनण्याची कोणत्याही श्रद्धेची प्रवृत्ती असते. धर्मातल्या या अनिष्ट प्रवृत्तीचे स्पष्टीकरण यात येऊन जाते आणि आज बुद्धिप्रामाण्याला डोक्यावर घेऊन नाचणाऱ्या लोकांनी बुद्धिप्रामाण्याचे तीन तेरा का वाजवावेत त्याचाही उलगडा होतो.

**धर्म आणि श्रद्धा यांचा संबंध**

धर्माच्या उत्पत्तीची अनेकांनी अनेक कारणे सांगितली आहेत, अनेक उपपत्ती लावल्या गेल्या आहेत. एके काळी धर्मविचार हा प्रत्यक्ष अनुभवांचा शब्दांत केलेला आविष्कार होता. ऋषी धर्मविचार देत म्हणजे आपले अनुभवच

लोकांच्या समोर मांडीत. धर्मविचाराला असलेली अनुभवाची, ज्ञानाची बैठक आज पार विसरली गेली आहे. सुखाचा शोध करणाऱ्या माणसाने ऋषींच्या उद्गारांवरच आपली श्रद्धा का ठेवली? कारण त्या मुनींचे आनंद, शांतता, समाधान यांनी परिपूर्ण असे जीवन त्याच्या समोर होते. सुखदु:खाच्या पलीकडे ते गेले आहेत हे लोकांना प्रत्यक्ष दिसत होते. पण त्या मुनिवर्यांनी केलेली तपश्चर्या करण्याची तयारी नसल्याने त्यांना प्रत्यक्ष ज्ञान होणे अशक्यच होते. ज्ञानाच्या अभावी त्यांनी त्यांचे बोलणेच प्रमाण मानले. धर्मविचारातील श्रद्धेची अशीच सुरुवात झाली असली पाहिजे.

### जुनी श्रद्धा, नवी श्रद्धा

या धर्मविचारात केवळ अध्यात्मविचार नव्हता तर सगळ्या चराचर सृष्टीसंबंधाचे त्यांचे ज्ञान साठविलेले होते. त्यांच्या सगळ्या धडपडीमागे विश्वघटनेमागचे सूत्र शोधून काढण्याची प्रेरणा होती. त्यामुळे धर्मविचाराला एका व्यापक जीवनदृष्टीचे स्वरूप प्राप्त झाले. भौतिक वस्तूंच्या अभ्यासाला स्थल, काल, साधना यांच्या मर्यादा असल्याने अर्थातच त्या क्षेत्रात फक्त प्राथमिक अवस्थेपर्यंतच ते जाऊ शकले. पण अध्यात्मविचारात स्थल, काल, साधना यांची मर्यादा नसल्याने त्याबाबतीत अत्यंत प्रगल्भ अवस्थेत त्यांचे ज्ञान जाऊन पोचले. कालांतराने धर्मविचारांतला पुष्कळसा भाग बाद झाला. धर्मविचाराची श्रद्धा बनली नसती तर जसजसे नवीन ज्ञान होत गेले तसतसा त्याचाही धर्मात समावेश झाला असता; पण ही गोष्ट श्रद्धेच्या विरुद्ध होती. म्हणून बाद ठरलेले ज्ञान व त्यावरील आधारीत आचार हे कायमच राहिले. त्यामुळे धर्मावरची श्रद्धा पूर्वीइतकी कार्यक्षम राहिली नाही. श्रद्धेचा विषय शकेल असा दुसरा व्यापक विचार लोकांपुढे नसल्याने ते जुन्याच श्रद्धेला चिकटून राहिले. पण पुढे विज्ञानात प्रगती झाली. विज्ञानाबरोबरच बुद्धिप्रामाण्याचा विचार आला. भौतिक क्षेत्रात सुरक्षितता देण्याची विज्ञानाची कुवत स्वाभाविकत:च जास्त होती. म्हणून लोकांनी जुनी श्रद्धा टाकून दिली आणि नवीन श्रद्धा निर्माण केली!

घ्यायचा तर गुणदोषांसह असेल, तसाच धर्म स्वीकारा किंवा संपूर्णतः तो टाकून द्या, असा एकांतिक आग्रह धर्मनिष्ठ व वैज्ञानिक या दोघांनी धरला. परिणामतः धर्मविचारांतला कालप्रवाहात बाद झालेला भाग तेवढा टाकायचा सोडून सगळा धर्मविचारच काही लोकांनी टाकावू ठरवून टाकून दिला. तर काहींनी बाद गोष्टींसहित तो कवटाळून धरला. त्यामुळे अध्यात्म व नीतीसंबंधी या धर्मात असलेले मौलिक ज्ञान नाकारल्यासारखे झाले. त्यात त्या सनातन तत्त्वांचे नुकसान नव्हते, तर माणसाचे नुकसान होते.

### नवश्रद्धेचा सतत शोध

कोणतीही श्रद्धा नवीन असली म्हणजे त्यानुसार आचरण करणाऱ्या माणसाच्या जीवनात एक नवीन जोम दिसून येतो. जो बलशाली होतो, त्याची झपाट्याने प्रगती होते; पण त्यानेच माणसाची दिशाभूल होते. हा उत्साह, त्या नव्या श्रद्धेचा नसून प्रामुख्याने जुन्या श्रद्धेच्या शृंखला तोडल्याने प्राप्त झालेल्या स्वातंत्र्याचा परिणाम असतो. पण त्याला वाटते ही नवी श्रद्धाच त्याला कारणीभूत आहे. पण थोड्याच अवकाशात नव्या श्रद्धेच्या शृंखला पायात पडतात. प्रगतीच्या पहिल्या धुंदीत ज्या उणिवांकडे दुर्लक्ष झालेले असते त्याची जाणीव होऊ लागते. त्याचे दुष्परिणाम दिसून येऊ लागतात. सुरुवातीला नवीन श्रद्धा स्वीकारणे धोक्याचे असल्याने आघाडीच्या माणसांची श्रद्धा जास्त कडक असते.

पण जसजशी जास्त माणसे त्या श्रद्धेचा स्वीकार करतात, तशी ती श्रद्धा निःसत्त्व (Diluted) बनते, तिच्यात दोष शिरतात. त्यामुळे सुखाचा शोध लागल्याच्या आशेला तडे जातात. नवी श्रद्धा जुनी बनते. पुन्हा नव्या श्रद्धेचा शोध सुरू होतो.

**श्रद्धेचा चक्रनेमिक्रम**

आज जगाची स्थिती अशीच आहे की विज्ञानावरील श्रद्धेमुळे माणूस त्रस्त झालेला आहे. धर्मश्रद्धेने काही शतकांपूर्वी त्याची अशीच स्थिती झाली होती. पण आजच्या स्थितीचे एक वैशिष्ट्य आहे. आज माणसाजवळ सर्वसंहारक अस्त्रे आहेत. धर्मश्रद्धा टाकून देताना धर्मविचारातला चांगला भागही लोकांनी टाकून दिला त्यामुळे नावेचे सुकाणूच मोडले. म्हणून आज माणूस भयग्रस्त झाला आहे. विज्ञान आणि बुद्धिप्रामाण्य यांवरची एकांतिक श्रद्धा लोक टाकून देऊ लागले आहेत आणि नवी श्रद्धा शोधू लागले आहेत. पुष्कळ जणांनी पुन्हा धर्माला कवटाळले आहे. विज्ञानामुळे उपलब्ध झालेल्या अस्त्रांनी भयग्रस्त झालेला माणूस पूर्वीप्रमाणेच आज विज्ञानाचा संपूर्ण त्याग करायच्या गोष्टी बोलू लागला आहे. पण हा श्रद्धेचा चक्रनेमिक्रमच आहे. तो तसाच चालू राहिला तर सुखाचा मूलभूत प्रश्न सुटणार नाही. आज सर्वसामान्य माणसाला एवढीच जाणीव आहे, की या दोन्ही श्रद्धा आपल्या आपल्या दृष्टीने पुरेशा नाहीत. पण आपण या अवस्थेला का येऊन पोचलो, याचे चिंतन न केल्याने आपण काय केले पाहिजे, हे त्याला आज कळेनासे झाले आहे.

ही समस्या इतकी जटिल बनण्याचे एक प्रमुख कारण म्हणजे माणसाच्या मनातील वैचारिक गोंधळ, तर्क, बुद्धिप्रामाण्य, विज्ञान, धर्म, अध्यात्म, नीतिशास्त्र, श्रद्धा यांच्या चुकलेल्या व्याख्या माणसाच्या डोक्यात आहेत. अजूनही धर्म विरुद्ध विज्ञान, श्रद्धा विरुद्ध बुद्धी असेच समीकरण त्याच्या मनात आहे. अजूनही सुरक्षिततेच्या शोधातूनच सुखाचा शोध लागेल अशी भ्रामक आशा त्याला आहे. त्यामुळे नुकसान होते ते लोक श्रद्धेला जड, संकुचित, आंधळी बनवितात. आपल्या सगळ्या दुःखांवर आणि क्लेशांवर 'रामबाण' उपाय शोधून काढण्याच्या प्रयत्नामुळे श्रद्धेमध्ये ही विकृती निर्माण होते.

**मानवी स्वभाव**

माणसाचा जो स्वभाव आपण पाहातो त्यावरून असे वाटते, की माणूस नव्या नव्या श्रद्धा निर्माण करीत राहील. ज्या वेळी त्याला असे अनुभवाला येईल, की कोणतीही श्रद्धा त्याला सुख द्यायला असमर्थ आहे आणि सुखदुःखा पलीकडे असलेल्या आनंदाचा त्याला ध्यास लागेल त्याच वेळी तो ह्या दुष्टचक्रातून आपली सुटका करून घेईल आणि ज्ञानोपासनेचा मार्ग स्वीकारील; पण आज जर या समस्येवर सखोल चिंतन झाले तर श्रद्धेची जी आंधळी, संकुचित, जड बनण्याची प्रवृत्ती आहे ती जाईल आणि व्यापक, उदार, डोळस बनण्याची प्रवृत्ती निर्माण होईल. श्रद्धेला चिकटलेले पुष्कळसे दुष्परिणाम नाहीसे होतील. अशी जागरूक श्रद्धा निर्माण होईल, अशी चिन्हे आज वाढत्या प्रमाणावर दिसत आहेत.